# ‘भीमसेनजी, सवाई गंधर्व आणि ध्वनिमुद्रणं’

---

वीसेक वर्षे होऊन गेली असतील. पुण्यात साहित्यसम्राट कै. नरसिंह चिंतामण केळकर हयांच्या नातवानं त्यांच्या संग्रहातल्या जुन्या ध्वनिमुद्रिका घेऊन जाण्याकरिता बोलावलं होतं. डेक्कन जिमखान्यावरच्या त्यांच्या प्रशस्त बंगल्यातून परत निघतांना त्यांनी वडिलांच्या लेखसंग्रहाचं एक पुस्तक भेट दिलं. १९५८ साली प्रकाशित झालेल्या य. न. केळकरांच्या ‘वाङमयाचा वाफा’ हया पुस्तकात पन्नासहून अधिक लेख आहेत. नोव्हेंबर १९५२ मध्ये पुण्यातल्याच ‘सहयाद्रि’ मासिकात प्रसिद्ध झालेल्या ‘सवाई गंधर्वांची अखेरची मुलाखत’ हया लेखानं माझं लक्ष वेधून घेतलं. त्या लेखाच्या शेवटी पुढील मजकूर आहे.

“भीमसेन व गंगूबाई या माझे गाणे बरेचसे गातात. तथापि भीमसेन हा गुणी असला तरी घराण्याची मुख्य गायकी तत्परतेने सांभाळण्यात काहीसा चुकारपणाच करतो. तो नादी आहे. हयाच्यातले हे चांगले वाटले, त्याच्यातले ते चांगले वाटले, तें तें घेऊन घराण्याच्या गायकीवर जोडून देतो. पण त्याचा जवा (की दुवा?) बेमालूम बसत नाही.”

त्या वेळी तरी हया लिखाणाचा अर्थ मला नीटसा समजला नव्हता. पंडितजींचं गाणं, स्वरलगाव व ‘स्वरभास्कर’ पदावरचं अढळ स्थान हयामुळं तर अधिकच बुचकळयात पडायला होत होतं. ऐंशी व अगदी नव्वदच्या दशकातही मुंबईतल्या रंगभवन, शिवाजी मंदिर,

रवींद्र नाटय मंदिर, झेवियर कॉलेज इथल्या महोत्सवांतून त्यांचं गाणं मनसोक्त ऐकलं होतं. दर आषाढी व कार्तिकी एकादशीला 'संतवाणी' व 'अभंगवाणी' च्या हाऊसफुल्ल कार्यक्रमांना हजेरी पण लावत होतो. ग्रामोफोन कंपनीनं त्यांच्या ध्वनिमुद्रिका पण बनवल्या होत्या. दुसरीकडं बोलपटांतल्या पार्श्वगायनातून त्यांच्या अनोख्या गायकीचं श्रवण होत होतंच. अगदी 'पोस्टकार्डावरचा पत्ता' ही बंदिश म्हणून गायले तरी ते गाणं गोड म्हणून घेण्यापर्यंत श्रोतेही तयार झालेले पहात होतो.

हया सगळया पार्श्वभूमीवर सवाई गंधर्वांचं ते भाष्य पुन्हा पुन्हा आठवत होतं. जमेल तेव्हां विविध क्षेत्रातल्या बुजुर्ग व जाणकारांशी बोलत होतो. ज्यांनी गुरु व शिष्य अशा दोघांचंही गाणं मनसोक्त ऐकलंय ती ज्येष्ठ मंडळी हलक्या आवाजात 'बोलू नकोस कुठं...' अशी सुरुवात करून अगदी कडक टीका करायची. एक करीम खान साहेब सोडले तर बाकी सगळयांनी 'किराणा' च्या नावाखाली 'किराणा-भुसार' गाण्याची दुकानं उघडली आहेत असं पण ऐकायला मिळायचं. आरडा ओरडा करून मोठमोठयानं गाणं व तानांचा अतिरेकी पाऊस पाडून टाळया घेणं हयानं लोकप्रियता मिळते. हमखास प्रसिद्धी व धनलाभ होतो. पण दूरवर पाहता संगीताची हानीच होते. पण हे बोलायची पण चोरी हो. असं बरंच काही ऐकायला मिळत असे.

वैयक्तिक मतं व पूर्वग्रह असतील असं समजून तिकडे दुर्लक्ष करायचो. पण हा विषय अधून मधून डोकं वर काढायचाच. तशात

जुन्या दुर्मिळ ध्वनिमुद्रिका जमविण्याचा, ऐकण्याचा व ऐकविण्याचा नाद वाढीला लागला. अन मग हळूहळू 'कानां'त प्रकाश पडायला लागला. बुजुर्ग ध्वनिमुद्रिका संग्राहकांच्या खजिन्यातली एकेक रत्नं ऐकता ऐकता अनेक गोष्टी हळूहळू उलगडू लागल्या.

१९२५ ते १९४५ हा वीसेक वर्षांचा कालखंड शास्त्रोक्त व सुगम संगीताच्या ध्वनिमुद्रणांचा सुवर्णकाळच म्हटला पाहिजे. तीन साडेतीन मिनिटांच्या काळात एखादा राग वा रचना मांडण्याची अवघड कला अनेकांनी आत्मसात केली होती. सुरुवातीला आग्रेवाली जोहराबाई व १९३0 नंतर नारायणराव व्यास हयांच्या ध्वनिमुद्रिका त्याबाबत अगदी आदर्शवत. अनेक गायक गायिकांनी त्यांचा कित्ता गिरवला. शंकरराव व्यास, प्रो. बी. आर. देवधर, विनायकबुवा पटवर्धन, ओंकारनाथ ठाकूर, बालपणातले कुमार गंधर्व, तरुणपणातले अमीर खान, विलायत हुसेन खान, फैय्याज खान व बडे गुलाम अली खान, केसरबाई केरकर, मोघूबाई कुर्डीकर व मल्लिकार्जून मन्सूर ही सगळीच मंडळी भरभरून ध्वनिमुद्रणं करीत होती. मास्तर क्रिष्णा, बालगंधर्व, बापूराव पेंढारकर, दीनानाथ मंगेशकर व त्यांचे गुरु रामकृष्णबुवा वझे हयांच्या नाटकातल्या पदांच्या व शास्त्रोक्त गायनाच्या रेकॉर्डस पण लोकप्रिय होत होत्या. तिकडे किराणा घराण्याचे खलिफा खुद्द करीमखान उतारवयात ध्वनिमुद्रणं करत होते. तर त्यांची मुलं म्हणजे हिराबाई व कमलाबाई बडोदेकर, सुरेशबाबू माने, सरस्वती राणे (माने) व पुतणी रोशन आरा बेगम केवळ ध्वनिमुद्रणंच करीत नव्हती तर नाटक सिनेमाच्या व्यवसायात यशस्वी होत होती. करीम खान साहेबांचे शिष्य सवाई गंधर्व स्वतः नाटकांतून कामं करीत

होते. शास्त्रीय, सुगम व नाटयसंगीत मुद्रित करत होते. त्यांचे शिष्य मास्टर फिरोझ दस्तूर बालनट या नात्यानं बोलपटांतून कामं करत होते. त्यांच्याही रेकॉर्डस निघत होत्या. गंगूबाई हनगळांच्या तर रागदारी बरोबरीनं मराठी भावगीतांच्या रेकॉर्डस गाजत होत्या.

हया सगळयाचा परिणाम विशीतील भीमसेनांवर होत होताच. शिकणं व भरपूर रियाझ करणं चालूच होतं. १९२१ मध्ये जन्मलेला बापूराव पलुस्कर (महाराज पलुस्करांचा पुत्र) हा नवा तारा उदयास येत होता. यात आपल्याला नवीन काय करता येईल हयाचा विचार तरुण भीमसेन करत होते. त्याचवेळी हया इतक्या ध्वनिमुद्रणांचा प्रभाव व संस्कार होतच होता. कारण करीमखान साहेबांच्या रेकॉर्डस ऐकूनच तर गाणं शिकायचा ध्यास घेतला होता ना? तीन मिनिटांची तबकडी ऐकण्याकरिता प्रसंगी चार पाच मैल चालत जावं लागत असे असं पंडितजींनीच नमूद करून ठेवलेलं आहे.

अशा हया सगळया पार्श्वभूमीवर व घराण्याच्या भिंती पुरेश्या अभेद्य असताना भीमसेनजींनी इतर घराण्यातल्या गोष्टी कश्या घेतल्या व मांडल्या हा खरंतर एखाद्या प्रबंधाचा विषय ठरावा. पण त्यासाठी त्या काळातलं त्यांचं गाणं ऐकलेली मंडळी हयात हवीत किंवा ती ध्वनिमुद्रणं उपलब्ध असायला हवीत. कारण सवाई गंधर्वांना जी गोष्ट स्पष्टपणे जाणवली ती प्रत्यक्ष मैफिलीत किंवा रियाजातच ठळकपणे प्रकट होत असली पाहिजे.

भीमसेनजींची अगदी सुरुवातीची व्यावसायिक ध्वनिमुद्रणं ऐकली तर ७८ गतीच्या चार ध्वनिमुद्रिकांवरती आठ राग आढळतात. कोलंबिया लेबलवर तीन ध्वनिमुद्रिका (सहा राग) मुद्रित झाले आहेत. अगदी पहिल्या ध्वनिमुद्रिकेवरती मुलतानी (साहिब जमाल तू तो पायो) व भैरवी (नाही परत मैको चैन) हे दोन राग आले असून त्या पाठोपाठच्या ध्वनिमुद्रिकेत शंकरा (कल ना परे) व सुहा कानडा (कानन सुना दे) हे राग आले आहेत. कोलंबिया लेबलवरच्या तिस-या ध्वनिमुद्रिकेत गुंद गुंद लावो (बसंत) व मिया मल्हार (महम्मद शाह रंगीले) हया बंदिशी असून बारकाईनं ऐकणा-याला करीम खान व सवाई गंधर्वांच्या गायकीचं एक अनोखं मिश्रण ऐकत असल्यासारखं वाटेल. हया ध्वनिमुद्रिका साधारणपणे १९४४/१९४५ च्या आसपासच्या म्हणजे भीमसेनजींच्या ऐन तारुण्यातल्या आहेत. त्या वेळी सवाई गंधर्व हयात होते. त्यांनी त्या ऐकल्या असणारच.

चौथी ध्वनिमुद्रिका दहा पंधरा वर्षांनंतरची म्हणजे १९५८ च्या आसपासची आहे. एच. एम. व्ही. लेबलवरील हया रेकॉर्डमध्ये पुरिया (बाजे झननन) व शुद्ध कल्याण (बतिया तोरा) हे राग आपल्या परिचयाच्या 'भीमसेनी' शैलीतले आहेत. हयाच सुमारास त्यांनी काही कानडी गाणी पण मुद्रित केली. पुढं मात्र बोलपट संगीताच्या ध्वनिमुद्रिकांचा अपवाद वगळता ७८ गतीच्या रेकॉर्डस फारश्या आढळत नाहीत. १९६0 नंतर एच. एम. व्ही. चे अधिकारी श्री. जी. एन. जोशींच्या पुढाकारानं शास्त्रीय संगीताच्या तीन इ. पी. व बारा/तेरा एल. पी. रेकॉर्डस झाल्या. आज पंडितजींच्या गायनाच्या पन्नासहून अधिक सी. डी. ज बाजारात उपलब्ध आहेत. 'भारत रत्न'

हा सर्वोच्च मानाचा किताब मिळाल्यावर मग मात्र ग्रामोफोन कंपनीला त्यांच्या पहिल्या वहिल्या ध्वनिमुद्रणांची आठवण झाली. संग्राहकांच्या मागं लागून २००९ साली कंपनीनं 'माय म्युझिक' शीर्षकाचा दोन सी. डीं. चा संच बाजारात आणला. पण त्याच्या माहिती पुस्तिकेत त्या पहिल्या वहिल्या ध्वनिमुद्रिका नेमक्या कोणत्या वर्षी प्रकाशित झाल्या इतकी प्राथमिक माहिती देण्याचे कष्ट सुद्धा संबंधित अधिकारी मंडळींनी घेतलेले नाहीत.

सवाई गंधर्वांनी आपल्या हया शिष्याच्या गाण्याची ही निराळी दिशा खूप अगोदरच ओळखली होती. गुरु म्हणून त्यांचं हे निरीक्षण अगदी अचूक होतं. पण हया प्रयोगाच्या यशस्वीतेची त्यांना काळजी पण वाटत असावी. भीमसेनजींनी विविध घराण्यातल्या चांगल्या गोष्टी निवडून किराण्याच्या साच्यात बसवल्या. वर्षानुवर्षे त्याचे उत्तमोत्तम स्वरगुच्छ बनवून श्रोत्यांना अर्पण केले. त्यांच्या नशिबानं त्याला प्रचंड यशही मिळालं. पण ते बघायला गुरुजी मात्र नव्हते.

=================================

डॉ. सुरेश चांदवणकर,
२६ जानेवारी २०११
chandvankar.suresh@gmail.com